S-20040719140536001-2500

**नागपूर जिल्हयातील जागतिक बँक सहाय्यित एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत चार नागरी प्रकल्पांकरीता अंगणवाडो सेविका व अंगणवाडो मदतनीस यांच्या निवड समिती अध्यक्षाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. एबावि-२००४/प्र.क्र.१४९/का-६,**
**नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : १० जून, २००४.**

**वाचा :** १. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र.एबावि-२००२/प्र.क्र.४१७/का-६, दिनांक १४ जानेवारी, २००४.

२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/आस्था/ अंग से मदतनीस रिक्त/०४-०५/का-१/१६०, दि. ८ जून, २००४.

**शासन निर्णय :** एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत नागरी प्रकल्पातील अंगणवाडो सेविका / मदतनीस यांची निवड समितीची पुर्नरचना करण्यात येऊन संदर्भीय अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आलेली आहे. तथापि, नागपूर जिल्हयात जागतिक बँक सहाय्यित एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत एकूण ४ नागरी प्रकल्प कार्यान्वित करावयाचे असून सदर प्रकल्पामध्ये अंगणवाडो सेविका व मदतनीस यांची निवड करावयाची आहे. मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र. १९६/२००१ मध्ये दिनांक २९/४/२००४ रोजी दिलेल्या आदेशानुसार मंजूर करण्यात आलेल्या सर्व अंगणवाडया सुरु करण्यासाठी अंगणवाडो सेविका / मदतनीस यांची सर्व रिक्त पदे दिनांक ३०/६/२००४ पर्यंत भरावयाची आहेत. त्यानुषंगाने नागपूर जिल्हयातील चार नागरी प्रकल्पातील अंगणवाडया सुरु करण्यासाठी अंगणवाडो सेविका / मदतनीस यांची निवड करण्याकरीता खालीलप्रमाणे तात्पुरत्या स्वरुपात निवड समित्या गठीत करण्यास या शासन निर्णयान्वये एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | नागपूर शहरातील प्रकल्पाचे नांव | निवड समितीचे अध्यक्ष |
|---|---|---|
| १ | बाल विकास प्रकल्प अधिकारी, गेट नागरोड, नागपूर | शासन निर्णय दि. १४/१/२००४ मध्ये नमूद केलेप्रमाणे जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, नागपूर. |
| २ | बाल विकास प्रकल्प अधिकारी, नागपूर-१ (नविन क्रमांक १) | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, अमरावती. |
| ३ | बाल विकास प्रकल्प अधिकारी, नंदनवन, नागपूर | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, बुलढाणा. |
| ४ | बाल विकास प्रकल्प अधिकारी, वाडो कामठी, नागपूर | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, अकोला. |

२.	उपरोक्त अनु. १ येथील शासन निर्णयानुसार समिती अध्यक्ष व सदस्य सचिव यांचे व्यतिरिक्त महानगरपालिका व नगरपालिका प्रतिनिधी, प्रकल्पातील वैद्यकीय अधिकारी हे अन्य दोन अधिकारी सदस्य आहेत. तथापि, नागपूर जिल्हयातील सदर चारही प्रकल्प अद्याप कार्यान्वित व्हावयाचे असल्याने तेथे वैद्यकीय अधिकारी उपलब्ध नाहीत. त्यामुळे या आदेशान्वये नियुक्त केलेल्या समिती अध्यक्षांच्या कार्यक्षेत्रातील अथवा नागपूर जिल्हयामधील इतर प्रकल्पातील वैद्यकीय अधिका-याची सदस्य म्हणून नियुक्ती करण्याबाबत आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी स्वतंत्र्यपणे संबंधितांना सूचना द्याव्यात.

३.	समिती अध्यक्षांनी त्यांचे मूळ पदाचे कामकाज सांभाळून निवड प्रक्रियेचे कामकाज अग्रक्रमाने पार पाडावयाचे आहे. निवड प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर त्यांनी सर्व अभिलेख जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, नागपूर यांचे स्वाधीन करावेत. निवड प्रक्रियेनंतर काही अडी-अडचणी उद्भवल्यास त्याचा निपटारा करण्याची जबाबदारी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, नागपूर यांची राहील.

४.	हे आदेश नागपूर जिल्हयातील उपरोक्त चार नागरी प्रकल्पांमधील अंगणवाडी सेविका व मदतनीस यांची निवड प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत अंमलात राहतील. निवड प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर आपोआप संपुष्टात येतील. उपरोक्त दिनांक १४/१/२००४ च्या शासन निर्णयातील शेवटच्या परिच्छेदातील आदेश जसेच्या तसे लागू राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( जी.एम.फोपळणकर )**
शासनाचे उप सचिव.

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
ग्रामविकास व जलसंधारण विभाग.
जिल्हाधिकारी, (नागपूर, अमरावती, अकोला, बुलढाणा)
मुख्य कार्यकारी अधिकारी, (नागपूर, अमरावती, अकोला, बुलढाणा)
जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, ((नागपूर, अमरावती, अकोला, बुलढाणा)
संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी.
निवड नस्ती, का-६.